बीड जिल्ह्यातील अंबेजोगाई येथे अप्पर पोलीस
**अधीक्षक यांचे कार्यालय व पोलीस ठाणे निर्माण करणे**
**तसेच मौजे सावर्णे / टोकावडे ता.मुरबाड जि.ठाणे येथे**
**नविन पोलीस ठाणे निर्माण करणे**

महाराष्ट्र शासन.
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एमआयएस- १७०२/प्र.क्र.३८/पोल-३
मंत्रालय मुंबई- ४०० ०३२ दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५

वाचा :- पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे क्रमांक पोमसं-२६/४७-बीड:अंबेजोगाई /२००२ दिनांक ४ जून २००४ चे पत्र.

प्रस्तावना :- जिल्हयातील मुख्यालयापासून अंबेजोगाई या शहराचे असलेले अंतर, अंबेजोगाई पोलीस स्टेशनचे कार्यक्षेत्र, तेथील गुन्हयांची संख्या, लोकसंख्या इत्यादी बाबी विचारात घेऊन पोलीस महासंचालक यांनी संदर्भाधीन पत्रान्वये प्रशासनात सुसुत्रता आणण्यासाठी अंबेजागाई येथे अपर पोलीस अधीक्षक,यांचे कार्यालय निर्माण करण्याचा तसेच तेथे नवीन ग्रामीण पोलीस ठाणे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता, या शिवाय ठाणे जिल्हयातील मौजे सावर्णे/टोकावडे तालुका मुरबाड जिल्हा ठाणे येथे नवीन पोलीस ठाणे निर्माण करण्याची आवश्यकता असून ते मंजूर करण्याची लोकप्रतिनिधींनी विनंती केली होती.वरील दोन्ही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :- वरील प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन शासन याव्दारे अंबेजागाई येथे अप्पर पोलीस अधीक्षक,यांचे कार्यालय, व अंबेजोगाई येथे नवीन ग्रामीण पोलीस ठाणे निर्माण करण्यास तसेच मौजे सावर्णे/टोकावडे तालुका मुरबाड जि.ठाणे येथे नवीन पोलीस ठाणे निर्माण करण्यासाठी खाली नमूद केल्याप्रमाणे पदे निर्माण करण्यास याव्दारे मान्यता देत आहे.

१) अंबेजोगाई येथे अप्पर पोलीस अधिक्षक यांचे कार्यालय निर्माण करण्यासाठी मंजूर करण्यात आलेली पदे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपये) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | अपर पोलीस अधीक्षक | १०,०००-३२५-१५२०० | १ |
| २ | पोलीस उपनिरीक्षक | ५५००-१७५-९००० | १ |
| ३ | पोलीस शिपाई | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | २ |
| ४ | चालक पोलीस शिपाई | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | २ |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक | ६५००-२००-१०५०० | १ |
| ६ | वरिष्ठ श्रेणी लिपिक | ४०००-१००-६००० | १ |
| ७ | कनिष्ठ श्रेणी लिपिक | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | २ |
| ८ | चपराशी | २५५०-५५-२६६०-६०-३२०० | १ |
| | | एकूण | ११ |

२) अंबेजोगाई येथे नविन अंबेजोगाई (ग्रामीण) पोलीस ठाणे निर्माण करण्यासाठी मंजूर करण्यात आलेली पदे -

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी (रुपये ) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | ७४५०-२२५-११०५० | १ |
| २ | पोलीस उपनिरीक्षक | ५५००-१७५-९००० | १ |
| ३ | पोलीस हवालदार | ४०००-१००-६००० | १३ |
| ४ | पोलीस शिपाई | ३०५०-७५-३९१०-८०-४५९० | २६ |
| ५ | चालक पोलीस शिपाई | ३०५०-७५-३९१०-८०-४५९० | १ |
| | | एकूण | ४२ |

३) मौजे सावर्णे /टोकावडे ता.मुरबाड जि.ठाणे येथे नविन पोलीस ठाणे निर्माण करण्यासाठी मंजूर करण्यात आलेली पदे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपये) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | पोलीस उपनिरीक्षक | ५५००-१७५-९००० | १ |
| २ | पोलीस हवालदार | ४०००-१००-६००० | ७ |
| ३ | पोलीस शिपाई | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | १५ |
| ४ | चालक पोलीस शिपाई | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | १ |
| | | एकूण | २४ |

२. वरील पदे निर्माण केल्यामुळे होणारा खर्च मागणी क्र.बी-९ - २०५५ पोलीस १०९ जिल्हा पोलीस (१) जिल्हा पोलीस बल " या खाली सन २००५-०६ आर्थिक वर्षात पावसाळी अधिवेशनात पुरक मागणी सादर करुन केलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. हा खर्च भागविणे सुलभ व्हावे म्हणून शासन रु.३०,३९,५००/- (तीस लाख एकोणचाळीस हजार पाचशे फक्त ) इतकी रक्कम खर्चासाठी पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यास याव्दारे मान्यता देत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर ३९७/०५ व्यय - ७ दिनांक १९-९-२००५ व अनौ.संदर्भ क्र. २५३/अर्थोपाय दि.१८.१०.२००५ अनुसार मान्यता घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( स. सी. संखे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक,नागपूर परिक्षेत्र नागपूर.
पोलीस अधीक्षक बीड,
पोलीस अधीक्षक ठाणे
प्रधान महालेखापाल,महाराष्ट्र -१(लेखा परीक्षा) मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-२(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
जिल्हा कोषागार,अधिकारी बीड
जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
वित्त विभाग,व्यय-७
गृह विभाग ,बियुडी - १.
निवड नस्ती, पोल-३